नव्याने स्थापित ग्रामीण रूग्णालय, मौदा, जिल्हा नागपूर करीता कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी घोषित करणेबाबत

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण- २०१८/ प्र.क्र. २९१/ आ-३

१० वा मजला, ए विंग गो. ते, रूग्णालय संकूल इमारत
लो.टि. मार्ग, मुंबई -४०० ००१
तारीख: २९ डिसेंबर , २०१८

वाचा -

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१३/प्र.क्र. १४१ /आ-३, दि. १३.०५.२०१४
२) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे क्रमांकः संआसे/गट- अ/टे-४/ आहरण व संवितरण अधिकारी/ ३२८६-८८/ कक्ष- १/ १८ , दि.०५.१०.२०१८ चे पत्र

**प्रस्तावना**

ग्रामीण रूग्णालय, मौदा, जिल्हा नागपूर करीता उपरोक्त दि. १३.०५.२०१४ च्या शासन निर्णयान्वये पदनिर्मिती करण्यात आलेली आहे. संदर्भ क्र. २ च्या प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने सदर रूग्णालयाकरीता कार्यालय प्रमुख, आहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय-**

ग्रामीण रूग्णालय, मौदा, जिल्हा नागपूर करीता "वैद्यकीय अधिक्षक (गट-अ) " या मंजूर पदास कार्यालय प्रमुख आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून या शासन निर्णयान्वये घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय १७ एप्रिल, २०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रसिद्ध वित्तीय अधिकार नियम पुस्तिका नियम क्र. २ नुसार प्रशासनिक विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्र. ४२८/ १८/को प्र-५, दि.११.१२.२०१८अन्वये देण्यात आलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२२४१२३८४५५४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Roshani Dinesh Kadam Patil

Digitally signed by Roshani Dinesh Kadam Patil
DN: CN = Roshani Dinesh Kadam Patil, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2018.12.29 12:40:31 +05'30'

**(रो.दि. कदम-पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. आयुक्त ( आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान , मुंबई.
२. महालेखापाल ( लेखा परीक्षा) / (लेखा अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
३. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
४. उप संचालक, आरोग्य सेवा, नागपूर मंडळ, नागपूर.
५. वैद्यकीय अधिक्षक, ग्रामीण रूग्णालय, मौदा, नागपूर
६. जिल्हा शल्य चिकित्सक, नागपूर.
७. जिल्हा आरोग्य अधिकारी, नागपूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
९. निवडनस्ती ( आ-३)